कुण्या एके काळी.....शिकागोमधे

# बैनी गुडमैनची गोष्ट



बैनी गुडमैनच्या वडिलांची प्रामाणिक इच्छा होती की एक गरीब यहुदी म्हणून त्यांना ज्याप्रकारचे हालाखीचे जीवन जगावे लागले, तसे जीवन त्यांच्या मुलांना जगावे लागू नये. त्यानी त्याच्या मुलांना संगीत वाद्य शिकायला प्रोत्साहित केले तेव्हा त्यांचा सर्वात लहान मुलगा प्रसिध्द झाज संगितकार होणार आहे याची त्यांना अजिबात कल्पना नव्हती. बैनी जेव्हा क्लेरिनेट वाजवित असत तेव्हा स्वत:ला अजिबात विसरून जात असत. आणि त्यांचे वादन ऐकणार्यानाही काळाचे भान रहात नसे.

ही गोष्ट त्या महान संगितकाराला काव्यात्मक श्रधांजली आहे

कुण्या एके काळी.....शिकागोमधे

# बैनी गुडमैनची गोष्ट



मराठी : गार्गी लागू

बेंजामिन डेविड 'बैनी' गुडमैन यांचा जन्म एलिनाइस, शिकागो येथे ३० मे १९०९ रोजी झाला. विसाव्या शतकाच्या ४ थ्या दशकामधे त्यांनी एक असा वाद्यवृंद तयार केला की ज्यामधे गोरे आणि अश्वेत, सगळ्यांना सामावून घेतल होते. गुडमैन हे पहिले प्रमुख संगीतकार होते ज्यांनी गोरे व अश्वेत यांना सामावून घेतले होते. अनेक प्रसिध्द कलाकार या वाद्यवृदांत होते. पियानो अप्रतिम वाजविणारे टेडी विल्सन, वाइब्राफोन वाजविणारे पहिले उत्कृष्ट कलाकार लिओनेल हैम्पटन होते, जीन कृपा ड्रमसाठी तर ट्रम्पेट वाजविण्यासाठी जिग्गी एल्मन.

नृत्यासाठी त्यांनी झाज संगीताचे सुंदर आयोजन केले होते. 'झाज' एक अभूतपूर्व  संगीत होते. रेडियोच्या माध्यमातून अमेरिकेत त्याला खूपच प्रसिध्दी मिळाली. रेडियोवर होणार्या  "चला, नाचू या" या गुडमैनच्या साप्ताहिक कार्यक्रमाने धमाल उडवून दिली. १९३७साली न्यू यार्क येथील पॅरामाउंट थिएटरमधे लोक गुडमैनच्या संगीतावर नाचू लागले तेव्हा अमेरिकेत नृत्य-युग सुरू झाले. लोक गुडमैनला नृत्य- संगीताचा सम्राट म्हणून ओळखू लागले.

गुडमैनने आपल्या नृत्य संगीतातून झाज संगीत जनसामान्यापर्यंत पोहोचविले. १६ जानेवारी १९३७ रोजी कार्नेगी सभागृहात झालेल्या ऐतिहासिक संगीत कार्यक्रमात झाज संगीताला कल्पनातीत उंचीवर नेऊन ठेवले.

गुडमैन यांनी आयुष्यात अनेक अल्बम बनविले. १३ जून १९८३ रोजी हार्ट अटॅक मुळे त्यांना मृत्यु आला. मृत्यु यायच्या काही वेळ आधी ते क्लैरिनेट वाजवित होते.







काही काळापूर्वीची गोष्ट आहे. शिकागोच्या एका भागात रशियामधून आलेले काही विस्थापित रहात होते. ते गरीब होते पण उत्साही होते.
रस्त्यावर या लोकांची वर्दळ असायची.
ते निरनिराळ्या वस्तु विकत असत आणि विकत घेत असत. उदा. भांडी, कपडे, फळ, भाज्या वगैरे.

घोडे, पोलिस, आणि लोणच्यांनी भरलेली मोठी मोठी पिंपही रस्त्यावर असायची.






तिथे खूप पाट्या लावलेल्या होत्या. त्या यहुदी किंवा रशियन भाषेत लिहीलेल्या असत. तिथले लोक याच भाषेत बोलत असत. त्यामुळे हा भाग विदेशच वाटायचा.

संध्याकाळी घरांच्या जिन्यावर, नाक्यावर बसून लोक उशिरापर्यंत गप्पा मारित बसायचे. त्यांचे नविन जीवन फारसे सुखाचे नव्हतेच, सोपे तर नव्हतेच नव्हते.



पण एक गोष्ट नेहमी त्यांच्याजवळ होती. .......त्यांचे संगीत ! सारंगी आणि अकाॅर्डियन वाजविणारे त्यांच्या देशातील गाणी वाजवित असत.



ते रस्त्याच्या कडेवर आपली वाद्य वाजवित असत, जिन्यात, गच्चीवर कुठेही बसून त्यांच वाद्यसंगीत चालू असे.





याच भागात डेव्हिड गुडमैन नावाचे एक
सज्जन आणि मेहनती यहुदी रहात होते.
बायको आणि मुलांची देखभाल
करण्यासाठी ते खूप कष्ट घेत होते.

त्यांचा परिवारही बराच मोठा होता.
पत्नी, डोरा, आणि त्यांची बारा मुलं!
एका छोट्या , अंधार्या घरात रहात होते.
बस.... इतकेच त्याच्याकडे होते.





डेव्हिड गुडमैन पूर्ण दिवस काम करायचे, पण पैसे विशेष मिळत नव्हते. कधी कधी ते मोठ्या कारखान्यात शिवणकाम करीत असत. पण एव्हढी मेहेनत करून स्वतःच्या मुलांसाठी चांगले कपडे शिवू शकत नव्हते.

डेव्हिडची पत्नी डोरा, कायम मुलांचे फाटके कपडे शिवत बसलेली असायची.





डेव्हिड गुडमैनला मनापासून वाटत होते की त्यांच्या मुलांना चांगले जीवन जगता यावे. म्हणून त्यांनी आपल्या तीन मुलांना, हैरी, फ्रेडी, आणि बैनी, यांना तिथल्याच यहुदी प्रार्थना घरांत घेऊन गेले. तिथे मुलांचा वाद्यवृंद होता. तिथे मुल एखाद वाद्य वाजवायला शिकतील अशी त्यांना आशा होती.

तीनही मुलांना त्यांच्या चणीप्रमाणे वाद्य दिली गेली. हैरीला एक ट्यूब दिली, फ्रेडीला ट्रम्पेट मिळाले आणि बैनीला मिळालं क्लैरिनेट...!



बैनी शांत स्वभावाचा मुलगा होता. जास्त बोलत नसे. पण खूप हसतमुख होता. बैनी, त्यांच्या ४ थीच्या वर्गात ते सर्वात लाजरे बुजरे होते. पण जेव्हा घरी येऊन आपले क्लैरिनेट बाहेर काढायचे........



तेव्हा प्रसन्नतेने त्यांचे डोळे चमकू लागायचे. क्लैरिनेटच्या डब्याच मखमली अस्तर वांग्याच्या रंगाच होतं. चांदीची चावी असलेली क्लेरिनेट काळी चमकदार होती. ते एक फार सुंदर वाद्य होते.



बैनीला गप्पागोष्टी करण्याएवाजी क्लैरिनेट वाजवत बसायला जास्त आवडायचे. अगदी थोड्या वेळासाठीही त्याचा परिवार बैनीला  क्लैरिनेटपासून दूर ठेऊ शकत नव्हता. अभ्यास करण्यासाठी त्यांची भावंडे त्यांना जिन्यावर पाठवित असत.




त्यांच्या निरंतर अभ्यासाला यश मिळाले. लवकरच त्यांना वाद्यवृदांत वादन करायची संधी मिळाली. बैनीचे वडिल, डेव्हिड यांना खूप आनंद झाला. त्यांना वाटले की बैनी मोठा होऊन पैसे कमावेल आणि चांगले दिवस येतील.






खर म्हणजे एव्हढा खर्च करण डेव्हिड गुडमैन यांना शक्य नव्हते. तरी त्यांनी  बैनीला महान संगीतकार फ्रँज शाॅप यांच्याकडे क्लैरिनेट शिकण्यासाठी पाठविले. बैनीने खूप अभ्यास केला....खूप अभ्यास केला....तान, स्वर, लय संगीताच्या प्रत्येक शाखेचा अभ्यास केला. फ्रैंज शाप स्वत: एक पारंपारिक क्लैरिनेट वादक होते. व ते बैनीला स्वत:सारखे वादक घडविण्यासाठी प्रशिक्षण देत होते.

पण बैनीला नव्या प्रकारचे संगीत आवडत होते. झाज लोकप्रिय होते आणि मनोरंजक पण होते. झाज सगीत ऐकल्यावर लोकांची मने  आनंदाने नाचू लागायची. बैनी फोनोग्रामवर आपल्या भावाचे  झाज संगीत ऐकत असत. रेकाॅर्ड ऐकून क्लैरिनेटवर प्रत्येक धुन ते वाजवू लागले.





बैनीला कळले की शिकागोमधील सेंट्रल पार्क थिएटरमधे नवोदित कलाकार आढवड्यातून एक रात्र आपली कला सादर करू शकतात. बैनी आपले क्लैरिनेट घेऊन तिथे गेले.

रंगमंचावर आल्यावर समोर मोठा प्रेक्षकवर्ग बघून त्यांना जराही भिती वाटली नाही. त्यांनी मनात ठरविलेल्या संगीत रचना आत्मविश्वासाने सादर केल्या.

त्यांनी केलेले वादन प्रक्षकांना खूप आवडले.

एक आठवड्यानंतर त्याच्या घरातील दूरध्वनीची घंटा वाजली. थिएटरच्या मालकाने दूरध्वनी केला होता. त्यांनी सांगितले की त्या रात्री कुणा दुसर्या कलाकाराऐवाजी बैनी वादन करू शकेल.

बैनी लगेचच थिएटरमधे पोहोचले. एका तासात त्यांनी ५ डालर्स कमाविले होते. त्यांचे वडील पूर्ण दिवस काम करूनही एव्हढे पैसे कमावू शकत नसत.




बैनी बद्दल लोकांना माहिती मिळाली. एका क्लबमधे झाज बँड वाजविला जात असे. त्या क्लबने बैनीला बोलावून घेतले. क्लबच्या बँड प्रमुखाने त्यांना विचारले की ते काही नविन रचना वाजवू शकतील का?. बैनी यांनी नवीन रचना नुसती वाजवून दाखविली नाही तर क्षणभरही न थांबता तीच रचना १६ वेगवेगळ्या पध्दतीने वाजवून दाखविली.  प्रत्येक धून अतिशय मधूर होती. प्रत्येकाच्या मनात एकच प्रश्न होता, "कोण आहे हा मुलगा?"



त्या दिवसानंतर बैनी शिकागोमधील अनेक क्लबमधे क्लैरिनेट वाजवू लागले. लवकरच त्यांना खूप प्रसिध्दी मिळाली. "एक आगळा वेगळा मुलगा , जो क्लैरिनेट वाजवितो. तो फक्त १४ वर्षाचा आहे पण मोठ्या वादकांच्या बरोबरीने वाजवितो" हे सर्व लोकांच्या तोंडून ऐकू येऊ लागले.

पण एका मुलासाठी हे सर्व अनोखे होते. दररोज रात्री खूप उशिरा पर्यंत वाजवून पहाटे ते घरी येत असत त्यावेळी त्यांचा खिसा डालर्सने भरलेला असे.

बैनी सर्व पैसे घरी देत होते. त्यांनी आपल्या वडीलांना सांगितले की त्यांनी वर्तमानपत्र विकणे अशासारखे कमी कष्टाचे काम करावे.
पण याचवेळी एक दुर्घटना घडली. बैनीचे वडील रस्ता ओलांडत असतांना एका गाडीने त्यांना धडक दिली. व ते मरण पावले.

बैनीचा विश्वासच बसत नव्हता. काय बोलावं, काय करावं, त्यांना समजतच नव्हते. त्यांना सर्वात प्रिय व्यक्ति म्हणजे त्यांचे वडिल होते.....पण आता ते नव्हते. बैनी यांना  वाटले की वडिलांना आनंदित करण्यासाठी त्यांना धन्यवाद द्यायचे राहून गेले. पण बैनी फार कमी बोलत असत. त्यांना जे सांगायचे ते आपल्या वादनातून ते सांगत असत.





म्हणूनच जेव्हा त्यांचे भाऊ, बहिणी अश्रू गाळीत होते .........

तेव्हा बैनी क्लेरिनेट वाजवित होते.........स्वत:ला पूर्णपणे विसरून.......!







.....आणि ते वाजवित राहिले.......

....वाजवित राहिले....जोपर्यंत
जगांतील सर्वांपर्यंत ते सुमधूर
संगीताचे स्वर पोहोचले नाहीत.....

